**जमाबंदी आयुक्त आणि संचालक, भूमि अभिलेख, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्या कार्यालयात उघडण्यात आलेल्या स्वीय प्रपंजी लेखा खात्यामध्ये अधिकार अभिलेखातून प्राप्त होणाऱ्या नक्कल फी मधून नवीन खर्चाच्या बाबी अनुज्ञेय करणे बाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः संकिर्ण-२०१८/प्र.क्र.२०९./ल-१.**
पहिला मजला, मुख्य इमारत, मंत्रालय,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई-४०००३२.
दिनांक : ०३ ऑगस्ट, २०२३

**वाचा :-**

१) महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्रमांक संकिर्ण-२०१८/प्र.क्र.२०९/ल-१, दि.२६.०३.२०१९.
२) जमाबंदी आयुक्त व संचालक, भूमी अभिलेख, पुणे यांचेकडील पत्र क्र.राभूअआका-१/स्विग्रले/खर्चाच्या बाबी /२०२०, दि.२७/०५/२०२०.
३) महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्रमांक संकिर्ण-२०१९/प्र.क्र.८३/ल-१, दि.१९.०९.२०१९.
४) महालेखापाल-२, म.रा.नागपूर यांच्या No.TM/Gr.III/PLA/Settlement Commissioner, Pune /UoR-१५/११३८, दि.१७.०२.२०२०.
५) महालेखापाल-२, म.रा.नागपूर यांच्या No.TM/Gr.III/PLA/Settlement Commissioner, Pune /UoR-१५/९५, दि.२६.०६.२०२०.
६) महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्रमांक संकिर्ण-२०१८/प्र.क्र.२०९/ल-१, दि.०२.०७.२०२०.
७) महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्रमांक संकिर्ण-२०१८/प्र.क्र.२०९/ल-१, दि.२१.०८.२०२०.
८) जमाबंदी आयुक्त व संचालक, भूमी अभिलेख, पुणे यांचेकडील पत्र क्र.राभू-४/PLA/खर्चात वाढ/३१७२४/२०२२, दि.०९.११.२०२२.

**प्रस्तावना :-**

राज्यात डिजीटल इंडिया लँड रेकॉर्ड मॉडर्नायझेशन कार्यक्रमातंर्गत जमाबंदी आयुक्त आणि संचालक, भूमि अभिलेख, पुणे यांच्या कार्यालयाकडून संगणकीय गा.न.नं. ७/१२, ८-अ, ई-फेरफार, ई-अभिलेख प्रकल्पांची आज्ञावली विकसीत करण्यात आलेल्या आहेत. या प्रणालीव्दारे वितरीत होणाऱ्या अधिकार अभिलेखाच्या नक्कल फी मधून प्राप्त होणारी एकूण रकमेतून जमाबंदी आयुक्त आणि संचालक, भूमि अभिलेख, पुणे यांच्या हिस्याची रक्कम जमा करण्यासाठी तसेच विकसित करण्यात आलेल्या/करण्यात येणाऱ्या ऑनलाईन प्रणालीच्या देखभाल, दुरूस्ती, तांत्रीक सहाय्य व दुरूस्तीसाठी येणाऱ्या खर्चासाठी व अन्य खर्चासाठी वाचा क्र.१ अन्वये जमाबंदी आयुक्त आणि संचालक, भूमि अभिलेख, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्या कार्यालयात नविन स्वीय प्रपंजी लेखा उघडण्यास मान्यता देण्यात आली आहे. तसेच दिनांक ०२.०७.२०२० रोजीच्या शासन निर्णयान्वये स्वीय प्रपंजी लेखा खात्यामधून विविध प्रकल्पांच्या अंमलबजावणीकरीता खर्च करण्यासाठीच्या बाबी अनुज्ञेय करण्यात आलेल्या आहेत. जमाबंदी आयुक्त व संचालक, भूमी अभिलेख, पुणे यांनी त्यांचे वाचा क्र. ८ च्या प्रस्तावान्वये जमाबंदी आयुक्त व संचालक, भूमी अभिलेख, पुणे यांचे कार्यालयातील स्वीय प्रपंजी लेखा खात्यामधून विविध प्रकल्पांच्या सुकर अंमलबजावणीच्या अनुषंगाने नवीन बाबींवर खर्च

करण्यास मान्यतेचा प्रस्ताव सादर केला असून दिनांक ०२.०७.२०२० रोजीचा शासन निर्णय सुधारित करण्याची विनंती केली आहे. त्यास अनुसरून दिनांक ०२/०७/२०२० व दिनांक २१/०८/२०२० रोजीच्या शासन निर्णयास सुधारणा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुसार शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :-**

जमाबंदी आयुक्त आणि संचालक, भूमि अभिलेख, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्या स्वीय प्रपंजी लेखा खात्यामध्ये अधिकार अभिलेखातून प्राप्त होणारी नक्कल फी जमा करणे व त्यामधून विविध अनुज्ञेय खर्चाच्या बाबींमध्ये समावेश करण्यासंदर्भात सादर केलेल्या प्रस्तावास अनुसरून आता पुढीलप्रमाणे मान्यता देण्यात येत आहे :-

(१) "तांत्रिक तसेच विशिष्ट प्रकारचे कामकाजसाठी सल्लागार/मनुष्यबळ नेमणूक-भूमि अभिलेख व महसूल विभागाच्या कोणत्याही कामकाज किंवा सेवेबाबत वैधानिक, प्रशासकीय व तांत्रिक बाबतीत सल्ला देणे किंवा एखाद्या क्षेत्रातील माहिती उपलब्ध करून देणे यासाठी बाहेर संस्थेची/मनुष्यबळाची मदत घेण्यासाठी होणारा खर्च करणे" या बाबींचा समावेश दिनांक २/७/२०२० रोजीच्या शासन निर्णयातील परि. १ (V) मधील खर्चाच्या बाबींमध्ये अ.क्र.१ (a) मध्ये होईल.

(२) दिनांक २.७.२०२० रोजीच्या शासन निर्णयातील परिच्छेद १ (V) मधील खर्चाच्या बाबींमध्ये अ.क्र. १ येथील (d) नंतर पुढीलप्रमाणे (e) चा समावेश करण्यात येत आहे.

**"जमाबंदी आयुक्त कार्यालयातील महसूल, भूमी अभिलेख विभागाच्या माहिती तंत्रज्ञान विषयक प्रकल्पांसाठी इमारत बांधकाम व अनुषंगीक खर्च (देखभाल व दुरुस्ती)-** जागा खरेदी करणे, उक्त जागेवर बांधकाम करणे, बांधीव इमारत विकत घेणे. उक्त कार्यालयाच्या इमारतींची दुरुस्ती करणे, सुशोभीकरण करणे, फर्निचर व इतर सुविधा खरेदी करणे किंवा स्थापित करणे इत्यादी बाबींवर अनावर्ती खर्च. बांधीव इमारत भाड्याने घेणे, कार्यालयीन स्वच्छता, प्रसन्न व कार्याभिमुख वातावरण, पिण्याचे पाणी व स्वच्छतागृहांची देखभाल इत्यादीवर आवर्ती खर्च करणे."

(३) दिनांक २१/८/२०२० रोजीच्या शासन निर्णयान्वये दिनांक २/७/२०२० रोजीच्या शासन निर्णयातील परि. १ (v) मध्ये नमूद बाबींवर "बाबनिहाय/प्रतिप्रस्ताव रक्कम रुपये १.०० कोटी पर्यंत शासनाच्या पुर्व मान्यतेशिवाय खर्चाचे /मंजुरीचे अधिकार जमाबंदी आयुक्त आणि संचालक भुमि अभिलेख यांना असतील", त्याऐवजी "बाबनिहाय/प्रतिप्रस्ताव रक्कम रुपये ३.०० कोटी पर्यंत शासनाच्या पुर्व मान्यतेशिवाय खर्चाचे /मंजुरीचे अधिकार जमाबंदी आयुक्त

आणि संचालक भुमि अभिलेख यांना असतील" अशी दिनांक २१.८.२०२० रोजीच्या शासन निर्णयात सुधारणा करण्यात येत आहे.

**२.** वाचा येथील दिनांक २.०७.२०२० रोजीच्या शासन निर्णयामधील इतर अटी व शर्ती कायम राहतील.

**३.** सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक १३६/२३/को.प्र.५, दिनांक १/६/२०२३ व अनौपचारिक संदर्भ क्रमांक २२०/२०२३/व्यय-१०, दिनांक २/६/२०२३ अन्वये प्राप्त सहमतीस अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे.

**४.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०८०३१२३२३१४७१९ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SUBHASH UTTAM RATHOD

Digitally signed by SUBHASH UTTAM RATHOD
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=RURAL DEVELOPMENT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=4900ceadef378ce6953fc366d818c664ad0c54be36d6234bdc213e86d85816c2, pseudonym=BCD86FFD867AD43A7B590E9CD3A8BDBDCA27C96B, serialNumber=1C01985DAA2DB39DF76EF8C33C169711D61EA01A32C5E5CACFAE4CC6C6F928A2, cn=SUBHASH UTTAM RATHOD
Date: 2023.08.03 17:59:18 +05'30'

**( सुभाष राठोड )**
**शासनाचे अवर सचिव**

**प्रतिः-**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई ४०००३२.
३. सर्व मा. मंत्री/ मा.राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई ४०००३२.
४. मा. अध्यक्ष, विधानसभा यांचे खाजगी सचिव, विधान भवान, मुंबई.
५. मा. सभापती, विधानपरिषद यांचे खाजगी सचिव, विधान भवन, मुंबई.
६. मा. उपाध्यक्ष, विधानसभा यांचे खासगी सचिव, विधान भवन, मुंबई.
७. मा.उपसभापती, विधानपरिषद यांचे खाजगी सचिव, विधान भवन, मुंबई.
८. मा. विरोधी पक्षनेता (विधानपरिषद) यांचे खाजगी सचिव, विधान भवन, मुंबई.
९. मा. विरोधी पक्षनेता (विधानसभा) यांचे खाजगी सचिव, विधान भवन, मुंबई.
१०. मा.मुख्य सचिव , महाराष्ट्र शासन,मंत्रालय, मुंबई.
११. अपर मुख्य सचिव (वित्त विभाग), मंत्रालय, मुंबई .
१२. अपर मुख्य सचिव (नियोजन विभाग), मंत्रालय, मुंबई.
१३. जमाबंदी आयुक्त आणि संचालक, भूमि अभिलेख, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१४. महालेखापाल १/२ (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परिक्षण) महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
१५. महालेखापाल (वाणिज्यिक लेखा परिक्षा) मुंबई.
१६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.

